**श्रीम.तृप्ती महेश कांबळे, उप संचालक औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई यांच्या विनंती बदलीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग,**
**शासन आदेश क्र.औसुवआ-०२२४/प्र.क्र.३३/कामगार-१**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- १४ मार्च,२०२४.

**वाचा:-** १."महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५"

**शासन आदेश:-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४) व ४ (५) मधील तरतूदीनुसार खाली नमूद केलेल्या, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई यांच्या आस्थापनेवरील उप संचालक, गट-अ या संवर्गातील अधिकाऱ्यास त्याच्या नावासमोर स्तंभ क्र.४ मध्ये दर्शविण्यात आलेल्या पदावर सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने बदलीने पदस्थापना देण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्याची पदस्थापना | विनंती बदलीनंतरच्या पदस्थापनेचे ठिकाण | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ |
| १ | श्रीम. तृप्ती महेश कांबळे | उप संचालक,औसुवआ, मुंबई | उप संचालक,औसुवआ, पुणे (कार्यक्षेत्र-३) | रिक्त पदावर |

२. प्रभारी संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय यांनी उपरोक्त अधिकाऱ्यास कार्यमुक्त करण्याबाबत आवश्यक कार्यवाही करुन, त्यांना त्यांच्या बदलीच्या ठिकाणी हजर होण्याच्या सूचना द्याव्यात व त्याबाबतचा अनुपालन अहवाल शासनास सादर करावा.

३. महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडतांना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ च्या कलम ४ (४) कलम ४ (५) व ६ मधील तरतूदीन्वये सक्षम प्राधिकारी यांना प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा वापर करुन हे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

४. तसेच, श्रीम. तृप्ती महेश कांबळे, उप संचालक यांची बदली त्यांच्या विनंतीनुसार केली जात असल्याने, त्यांना पदग्रहण अवधी, प्रवास भत्ता व तद्‌नुषंगिक लाभ अनुज्ञेय राहणार नाहीत.

५. सदर आदेश, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२४०३१४१६५९३४३०१० असा आहे. सदर आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

DEEPAK UTTAMRAO POKALE

Digitally signed by DEEPAK UTTAMRAO POKALE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=856b31c793b12e4f22cb247c5cff7f3358867f2482aa2234f6131bf8940dbd2e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=F4163205E7B4960CC7CA6F973D6DEB06502B2E8FC47A411BABCF42A0E99CF34B, cn=DEEPAK UTTAMRAO POKALE
Date: 2024.03.14 17:08:39 +05'30'

**( दिपक पोकळे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

प्रभारी संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, ५ वा मजला, कामगार भवन, ब्लॉक-ई, सी-२०, वांद्रे-कुर्ला संकुल, वांद्रे (पूर्व), मुंबई.

**प्रत,**

१. मा.मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
२. मा.प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक,उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग,मंत्रालय, मुंबई-३२.
३. श्रीम. तृप्ती महेश कांबळे,उप संचालक,औसुवआ,संचालनालय,मुंबई (संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई यांचेमार्फत)
४. अपर संचालक,औद्योगिक सुरक्षा व आरोग्य,पुणे.
५. महालेखापाल-१/२, (लेखा परीक्षा/लेखा व अनुदेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६. जिल्हा कोषागार अधिकारी,पुणे/मुंबई.
७. अधिदान व लेखा अधिकारी,पुणे/मुंबई.
८. उप सचिव / अवर सचिव (कामगार-१), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
९. निवड नस्ती (कामगार-१)